**ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई आणि नागपूर कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - एमएलआय ०७१७/ प्र. क्र. २०/ कामगार - ६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - १२ मार्च, २०२४.

**वाचा** - १. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. एमएलआय-११००/प्र.क्र. ८५३०/कामगार-६, दि. २८/०२/२००६

२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. असंक-१००१/प्र.क्र. २९/२००१/वित्तीय सुधारणा, दि. १०/०९/२००१

३. मा. अपर मुख्य सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली दि. २७/६/२०२३ रोजी झालेल्या उप समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

४. मा. मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखाली दि. १३/०७/२०२३ रोजी झालेल्या उच्च स्तरीय समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

५. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विद्या.१ दि. ०८/०३/२०१९

६. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०२२/प्र.क्र. १५/आपुक, दि. २७/०४/२०२२

७. संचालक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई यांचे पत्र क्र. - मश्रविसं/ ११६, दिनांक १९/०१/२०२३

८. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. एमएलआय-२०२२/प्र.क्र.१५८ /कामगार-६ दि. ०१/०२/२०२३

**प्रस्तावना :-**

ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई या संस्थेची स्थापना दि. ७ जुलै १९४७ रोजी आणि ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूरची स्थापना दि. २५ जून १९७१ रोजी करण्यात आली. या दोन्ही संस्थांमध्ये नवीन शैक्षणिक धोरण २०२० प्रमाणे शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून मानवी भांडवली व्यवस्थापन व कर्मचारी संबंध या विषयाची पदव्युत्तर पदवी (Master of Human Capital Management and Employee Relations -MHCM&ER) हा अभ्यासक्रम अनुक्रमे मुंबई विद्यापीठ आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ यांच्या मान्यतेने राबविला जातो. यापूर्वी जुना अभ्यासक्रम हा श्रम विज्ञान विषयाची पदव्युत्तर पदवी (Master of Labour Studies-M.L.S.) या नांवाने ओळखला जात होता.

२. महाराष्ट्र राज्यामध्ये औद्योगिक क्षेत्रात शांतता नांदण्याकरिता मालक व कामगार यांच्यामधील संबंध सौहार्दपूर्ण राहण्यासाठी, कामगार कल्याण व उत्पादकता वाढविण्याकरिता आवश्यक प्रशिक्षित व्यावसायिक नेतृत्व (Business Leadership) तयार करणे आणि कामगार विषयक अध्ययनातील उत्कृष्टतेचे केंद्र (Centre of Excellence) बनवणे याकरिता हा दोन वर्षाचा पूर्णवेळ पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम राबविला जातो.

३. संस्थेला एकूण ७६ वर्षांचा गौरवशाली इतिहास असून या संस्थेतून आतापर्यंत हजारो विद्यार्थ्यांनी शिक्षण घेऊन विविध क्षेत्रांमध्ये उच्च पदे भूषविलेली आहेत तर अनेक विद्यार्थी भारताबाहेर देखील वेगवेगळया देशांमध्ये मानव संसाधन विकास (Human Resource Development) या क्षेत्रात कार्यरत आहेत. हा अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांना खाजगी उद्योगधंद्यामध्ये तसेच शासकीय, निमशासकीय आस्थापनांमध्ये आकर्षक वेतनावर रोजगाराच्या संधी उपलब्ध होतात. विशेषत: मानव संसाधन विकास, औद्योगिक संबंध, कामगार कायद्याचे अनुपालन (Labour Law Compliance) या क्षेत्रात मागणी वाढत आहे.

४. सध्याच्या स्पर्धात्मक युगामध्ये गुणवत्तापूर्ण शिक्षण विद्यार्थ्यांना मिळण्याकरिता तसेच विद्यार्थ्यांमध्ये व्यावसायिक नेतृत्व निर्माण होण्यासाठी कौशल्यावर आधारित अभ्यासक्रम राबविणे आवश्यक आहे. त्यासाठी त्या दर्जाच्या सर्व शैक्षणिक सोयी सुविधा, तज्ञ मार्गदर्शक, पायाभूत सोयी सुविधा, अद्ययावत तंत्रज्ञान या बाबी विकसित करुन उद्योग जगताला आवश्यक असणारे प्रशिक्षित व्यावसायिक मनुष्यबळ तयार करणे आवश्यक आहे. याकरिता विद्यार्थ्यांना प्रशिक्षण देणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेवून संस्थेच्या मुंबई व नागपूर येथील कार्यालयाचा आकृतीबंध सुधारीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

५. संचालक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भित पत्राने सादर केलेल्या आकृतीबंध सुधारीत करण्याचा प्रस्ताव विचारात घेवून संस्थेचा सुधारीत आकृतीबंध मा. मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सचिव समितीसमोर सादर करण्यात आला होता. समितीच्या दि. १३/७/२०२३ रोजी झालेल्या बैठकीत ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व नागपूर कार्यालयाच्या सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई आणि नागपूर या संस्थांचा आकृतीबंध सुधारीत करण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र "अ" मध्ये नमूद केलेनुसार ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवरील १५ नियमित पदे आणि या संस्थेच्या नागपूर कार्यालयाच्या आस्थापनेवरील घटकनिहाय एकूण १० नियमित व बाह्य यंत्रणेद्वारे घ्यावयाच्या मनुष्यबळाच्या एकूण २७ पदे व तासिका तत्वावर घेण्याच्या मनुष्यबळाच्या सेवा १६ अशा सुधारीत आकृतीबंधास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. मृत संवर्ग :- प्रपत्र "अ" मधील जे संवर्ग मृत ठरविण्यात आले आहेत, त्या संवर्गात सध्या कार्यरत असलेल्या कर्मचारी यांची पदोन्नती / सेवानिवृत्ती / राजीनामा / मृत्यू इ. अथवा अन्य कारणाने ती पदे जसजशी रिक्त होतील तशी आपोआप रद्द होतील त्यानंतर त्या संवर्गात नविन पदभरती करता येणार नाही. तथापि, सदर मृत होणाऱ्या संवर्गातील सध्या कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतनाची गैरसोय होऊ नये याकरीता अशा पदाचा स्वतंत्र तक्ता प्रपत्र -"ब" येथे दर्शविलेला आहे.

२. निरसित पदे :- प्रपत्र "अ" येथील जी पदे निरसित करण्यात आली आहेत. त्या पदांवर सध्या जितके कर्मचारी कार्यरत असतील तितकी पदे अधिसंख्य गणण्यात यावीत. सदर अधिसंख्य पद त्यावर कार्यरत व्यक्तीच्या सेवानिवृत्ती /राजीनामा /मृत्यू इ. कारणामुळे रिक्त झाल्यानंतर ते पद आपोआप रद्द होईल. सदर पदावर कार्यरत कर्मचाऱ्यांचे विभागामधील उपलब्ध पदांवर समावेशन करण्याच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या दिनांक १०/९/२००१ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार तपासणी करून विभागाने उचित कार्यवाही करावी. निरसित पदांचा स्वतंत्र तक्ता प्रपत्र "क" येथे दर्शविण्यात आला आहे.

३. प्रपत्र "अ" मधील सेवा बाह्ययंत्रणेकडून घेताना सदर निरसित पदांवर / मृत संवर्गामध्ये सध्या कार्यरत असलेली पदे वगळून उर्वरित मनुष्यबळसंख्येच्या प्रमाणात सेवा बाह्ययंत्रणेकडून घेण्यात याव्यात. निरसित/मृत संवर्गातील पदे रिक्त झाल्यानंतर आपोआप रद्द होतील. तद्नंतर त्या सेवा आवश्यकतेनुसार बाह्ययंत्रणेद्वारे घेता येतील.

४. अधिव्याख्याता या पदाचे सुधारित पदनाम सहायक प्राध्यापक असे शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विद्या.१ दि. ०८/०३/२०१९ च्या शासन निर्णयाप्रमाणे बदलण्यात आले असून त्यास सामान्य प्रशासन विभागाच्या अनौ. सं. क्र. ११४०/२०२३ दि. १४/१२/२०२३ व वित्त विभागाच्या अनौ.सं. क्र. ७६/सेवा-९ दि. ०२/०२/२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

५. बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेतांना वित्त विभागाच्या दि. २७/०४/२०२२ च्या शासन निर्णयातील सूचनांचे व याबाबत वेळोवेळी देण्यात येणाऱ्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६ . हा शासन निर्णय मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सचिव समितीच्या दिनांक १३/७/२०२३ च्या बैठकीच्या इतिवृत्तानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौ.सं. क्र. ७६/सेवा-९ दि. ०२/०२/२०२४ आणि अनौ.सं. क्र. ४१/आपुक, दि. २४/०१/२०२४, व्दारे दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१२१४१८४८७६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SWAPNIL
YASHWANTRAO
KAPADNIS

Digitally signed by SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=3389518a88af500ef17fd52858804c56d5b0db93ce68c9638764849614f0c8b3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=824DB7B32ED13AAC7B6F1F11E717770B52D6784F2BC41DDF0E4E9729CDB96F88, cn=SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
Date: 2024.03.12 14:28:27 +05'30'

**( स्वप्निल कापडणिस )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
६) सर्व सन्माननीय संसद, विधानसभा, विधान परिषद सदस्य यांचे खाजगी सचिव.
७) प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) संचालक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई.
९) उप संचालक, ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर.
१०) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
११) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१२) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
१३) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१६) वित्त विभाग (सेवा-९/आ.पु.क.)
१७) सामान्य प्रशासन विभाग का-१२
१८) निवड नस्ती (कामगार - ६), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग.

**शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा, कामगार व खणीकर्म विभाग,**
**क्र. - एमएलआय ०७१७/ प्र. क्र. २०/ कामगार - ६,**
**दिनांक १२ मार्च २०२४**
**सोबतचे प्रपत्र “अ”**

**(ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई आणि नागपूर कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतीबंध)**

**अ) नियमित पदे -**

**ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई**

| अ.क्र. | सध्याचे पदनाम | सुधारित पदनाम | वेतनश्रेणी (७ वा वेतन आयोग) | जुन्या आकृतीबंधातील पदे | मंजूर पदे |
|---|---|---|---|---|---|
| | | | **गट अ** | | |
| १. | संचालक | संचालक | At Academic Level 14<br>Rs. 1,44,200-2,18,200<br>+ Spl. Allowance Rs. 6,750/- | १ | १ |
| २. | प्राध्यापक (कामगार अर्थशास्त्र) | प्राध्यापक (श्रमविज्ञान) | At Academic Level 14<br>Rs. 1,44,200-2,18,200 | १ | १ |
| ३. | प्राध्यापक (औद्योगिक समाजशास्त्र) | -- | At Academic Level 14<br>Rs. 1,44,200-2,18,200 | १ | ० |
| ४. | नवीन पद | सहयोगी प्राध्यापक (श्रमविज्ञान) | At Academic Level 13 A<br>Rs. 1,31,400-2,17,100 | -- | १ |
| | | | **गट ब** | | |
| ५. | अधिव्याख्याता (कामगार कल्याण, क्षेत्रकाम निदेशक, औद्योगिक अर्थशास्त्र) | सहायक प्राध्यापक (श्रमविज्ञान) | At Academic Level 10<br>Rs. 57,700-1,82,400 | ३ | २ |
| ६. | संशोधन अधिकारी | -- | S-15<br>Rs. 41,800-1,32,300 | १ | ० |
| ७. | प्रबंधक | प्रबंधक | S-15<br>Rs. 41,800-1,32,300 | १ | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | **गट क** | | |
| ८. | अधिव्याख्याता (कामगार संघटना व औद्योगिक संबंध कनिष्ट श्रेणी) | -- | S-15<br>Rs. 41,800-1,32,300 | १ | ० |
| ९. | संशोधन सहाय्यक | -- | S-14<br>Rs. 38,600-1,22,800 | ५ | ० |
| १०. | ग्रंथपाल | ग्रंथपाल | S-14<br>Rs. 38,600-1,22,800 | १ | १ |
| ११ | सहाय्यक ग्रंथपाल | -- | S-7<br>Rs. 21,700-69,100 | १ | ० |
| १२. | अधीक्षक | अधीक्षक | S-14<br>Rs. 38,600-1,22,800 | १ | १ |
| १३ | वरिष्ठ लिपिक | वरिष्ठ लिपिक | S-8<br>Rs. 25,500-81,100 | १ | १ |
| १४ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | -- | S-16<br>Rs. 44,900-1,42,400 | १ | ० |
| १५ | लघुटंकलेखक | लघुटंकलेखक | S-8<br>Rs. 25,500-81,100 | ४ | २ |
| १६ | रोखपाल / लिपिक-टंकलेखक | रोखपाल/ लिपिक-टंकलेखक | S-6<br>Rs. 19,900-63,200 | ४ | ४ |
| १७. | वाहन चालक | -- | S-6<br>Rs. 19,900-63,200 | १ | ० |
| | | | **गट ड** | | |
| १८. | शिपाई | -- | S-1<br>Rs. 15,000-47,600 | ५ | ० |
| १९. | हमाल | -- | S-1<br>Rs. 15,000-47,600 | १ | ० |
| २० | माळी | -- | S-1<br>Rs. 15,000-47,600 | १ | ० |
| २१ | रखवालदार | -- | S-1<br>Rs. 15,000-47,600 | २ | ० |
| २२ | सफाईगार | -- | S-1<br>Rs. 15,000-47,600 | २ | ० |
| | | **एकूण** | -- | ३९ | **१५** |

## ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर

| अ.क्र. | सध्याचे पदनाम | सुधारित पदनाम | वेतनश्रेणी (७ वा वेतन आयोग) | जुन्या आकृतीबंधातील पदे | मंजूर पदे |
|---|---|---|---|---|---|
| | | | **गट - अ** | | |
| १. | उप संचालक | उपसंचालक (सहयोगी प्राध्यापक समकक्ष) | At Academic Level 13 A Rs. 1,31,400-2,17,100 | १ | १ |
| २. | (नवीन पद) | सहयोगी प्राध्यापक (श्रमविज्ञान) | At Academic Level 13 A Rs. 1,31,400-2,17,100 | -- | १ |
| | | | **गट - ब** | | |
| ३. | अधिव्याख्याता | सहायक प्राध्यापक (श्रमविज्ञान) | At Academic Level 10 Rs. 57,700-1,82,400 | १ | २ |
| | | | **गट - क** | | |
| ४. | फॅकल्टी सहाय्यक | -- | S-14 Rs. 38,600-1,22,800 | १ | ० |
| ५. | ग्रंथपाल | ग्रंथपाल | S-14 Rs. 38,600-1,22,800 | १ | १ |
| ६. | अधीक्षक | अधीक्षक | S-14 Rs. 38,600-1,22,800 | १ | १ |
| ७. | वरिष्ठ लिपिक | वरिष्ठ लिपिक | S-8 Rs. 25,500-81,100 | १ | १ |
| ८. | लघुटंकलेखक | लघुटंकलेखक | S-8 Rs. 25,500-81,100 | १ | १ |
| ९. | रोखपाल / लिपिक-टंकलेखक | रोखपाल / लिपिक-टंकलेखक | S-6 Rs. 19,900-63,200 | २ | २ |
| | | | **गट - ड** | | |
| १०. | शिपाई | -- | S-1 Rs. 15,000-47,600 | ३ | ० |
| | | **एकूण** | **--** | १२ | **१०** |

ब) बाह्ययंत्रणेमार्फत घ्यावयाच्या मनुष्यबळ सेवा

| **अ.क्र.** | **सध्याचे पदनाम** | **मनुष्यबळ संख्या** | | |
|---|---|---|---|---|
| | | **मुंबई** | **नागपूर** | **एकूण** |
| १ | Placement Officer (प्लेसमेंट ऑफीसर) | मुंबई/नागपूर | | १ |
| २ | वाहन चालक | १ | १ | २ |
| ३ | बहुउद्येशीय कार्य सहायक / आय.टी सहाय्यक | २ | २ | ४ |
| ४ | शिपाई | ४ | ४ | ८ |
| ५ | माळी | १ | १ | २ |
| ६ | सफाईगार | २ | २ | ४ |
| ७ | सुरक्षा रक्षक | ३ | ३ | ६ |
| | एकूण मनुष्यबळ | १३ | १३ | २७ |

## क) तासिका तत्वावर घेण्याच्या मनुष्यबळ सेवा

| **अ.क्र.** | **सेवा** | **मनुष्यबळ संख्या** | | |
|---|---|---|---|---|
| | | **मुंबई** | **नागपूर** | **एकूण** |
| १ | तासिका तत्वावरील शिक्षक | ८ | ८ | १६ |
| | एकूण | ८ | ८ | १६ |

# प्रपत्र “ब”

**ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई**
**मृत संवर्गात कार्यरत कर्मचारी**

| अ.क्र. | मृत संवर्गाचे पदनाम | मृत पदसंख्या | कार्यरत कर्मचारी |
|---|---|---|---|
| १ | संशोधक सहायक | ५ | १ |
| २ | वाहन चालक | १ | १ |
| ३ | शिपाई | ५ | ४ |
| ४ | हमाल | १ | ० |
| ५ | माळी | १ | १ |
| ६ | रखवालदार | २ | १ |
| ७ | सफाईगार | २ | १ |

**ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर**
**मृत संवर्गात कार्यरत कर्मचारी**

| अ.क्र. | मृत संवर्गाचे पदनाम | मृत पदसंख्या | कार्यरत कर्मचारी |
|---|---|---|---|
| १ | शिपाई | ३ | १ |

## प्रपत्र "क"

### ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई निरसित पदे व त्या पदांवर कार्यरत कर्मचारी

| अ.क्र. | निरसित पदाचे नांव | निरसित पदसंख्या | कार्यरत कर्मचारी |
|---|---|---|---|
| १ | प्राध्यापक (औद्योगिक समाजशास्त्र) | १ | ० |
| २ | संशोधन अधिकारी | १ | ० |
| ३ | अधिव्याखाता (कामगार संघटना व औद्योगिक संबंध कनिष्ठ श्रेणी) | १ | ० |
| ४ | सहायक ग्रंथपाल | १ | ० |
| ५ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | १ | ० |
| ६ | लघुटंकलेखक | २ | ० |

### ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर

| अ.क्र. | निरसित पदाचे पदनाम | निरसित पदसंख्या | कार्यरत कर्मचारी |
|---|---|---|---|
| १ | फॅकल्टी सहायक | १ | ० |

*****************